मुंबई गोवा राष्ट्रीय महामार्ग क्र.६६ (जुना १७) वरील सावित्री नदीवर बिरवाडी ता.महाड गावाजवळ असलेला ब्रिटीशकालीन कमानी पूल दि.२/०८/२०१६ रोजी रात्री सुमारे ११.३० चे दरम्यान महापूरात वाहून गेल्याबाबत न्यायालयीन चौकशीसाठी नियुक्त आयोगास सहाय्य करण्यासाठी नोडल/समन्वय अधिकारी यांची नियुक्ती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्र. न्यायाप्र-२०१६/प्र.क्र.२५८/रा.म.-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २९ ऑक्टोबर, २०१६

**प्रस्तावना:-**

मुंबई-गोवा राष्ट्रीय महामार्ग क्र.६६ (जुना-१७) वर कि.मी.१२९/४०० मध्ये सावित्री नदीवर बिरवाडी ता.महाड गावाजवळ असलेला ब्रिटीशकालीन कमानी पूल दिनांक २ ऑगस्ट, २०१६ रोजी रात्री सुमारे ११.३० चे दरम्यान महापूरात वाहून गेला आहे. त्यामुळे या घटनेची न्यायालयीन चौकशी करण्यात येईल अशा आशयाचे निवेदन मा.मुख्यमंत्री महोदयांनी दिनांक ४/८/२०१६ रोजी महाराष्ट्र विधानसभा तसेच विधानपरिषदेत निवेदन केले आहे. त्याअनुषंगाने शासन निर्णय क्र.न्यायाप्र-२०१६/प्र.क्र.२५८/रा.म.-१, दिनांक १ ऑक्टोबर, २०१६ अन्वये THE COMMISSION OF INQUIRY ACT, १९५२ मधील तरतूदीनुसार न्यायालयीन चौकशी करण्यासाठी श्री. एस.के.शाह, सेवानिवृत्त न्यायाधीश, उच्च न्यायालय, मुंबई यांची एक सदस्यीय समिती नियुक्त केली आहे. सदर समितीस सहाय्य करण्यासाठी नोडल/समन्वय अधिकारी नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

दिनांक १ ऑक्टोबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये दिनांक २/८/२०१६ रोजी महापूरात सावित्री नदीवर बिरवाडी ता.महाड गावाजवळ असलेला ब्रिटीशकालीन कमानी पूल वाहून गेल्याबाबत THE COMMISSION OF INQUIRY ACT, १९५२ मधील तरतूदीनुसार न्यायालयीन चौकशी करण्यासाठी श्री. एस.के.शाह, सेवानिवृत्त न्यायाधीश, उच्च न्यायालय, मुंबई यांच्या नियुक्त केलेल्या एक सदस्यीय समितीस सहाय्य करण्यासाठी मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांची नोडल/समन्वय अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

नोडल / समन्वय अधिकारी यांची कामकाजाची रुपरेषा पुढीलप्रमाणे राहील.

१. नोडल/समन्वय अधिकारी यांनी सर्वप्रथम शासनाने नियुक्त केलेले चौकशी आयोग श्री.एस.के.शाह यांच्याशी संपर्क साधून आयोगाचे कामकाज सुरु होण्यासाठी आवश्यक ती पूर्व तयारी करण्याची व्यवस्था करावी.
२. आयोगास आवश्यक असणारे सर्व-सोयीयुक्त कार्यालय आयोगाच्या पूर्वपरवानगीने निश्चित करुन उपलब्ध करुन देण्यात यावे.

३. नोडल/समन्वय अधिकारी यांनी आयोगाच्या संपर्कात राहून कामकाज सुरु ठेवण्याच्या दृष्टीने आयोगाला आवश्यक असणा-या वस्तु व साधनसामुग्री इ. चा त्यांच्या मागणीनुसार पुरवठा करावा.
४. आयोगाच्या कामकाजाचा दैनंदिन व इतर खर्च अदा करण्यासाठी आवश्यक निधी उपलब्ध होणेबाबत प्रस्ताव शासनास सादर करावा.
५. आयोगाकडे चौकशी विषयक कामकाजाचा पाठपुरावा करुन, विहीत मुदतीत शासनास अहवाल सादर होणेबाबत कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक क्रमांक २०१६११०४११०००७०३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradeep E Dalvi

Digitally signed by Pradeep E Dalvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=PWD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=716d09513325160a8ae457d38bdb1108a805f4db1fec141f11bc887b7810d338, cn=Pradeep E Dalvi
Date: 2016.11.04 11:02:17 +05'30'

(प्रदीप दळवी)
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

**प्रत माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी सादर अग्रेषित:-**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्रयांचे सचिव
३. मा.मंत्री, (महसूल, मदत व पुनर्वसन, सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे खाजगी सचिव
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. सचिव, रस्ते वाहतूक व महामार्ग मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली
७. अपर मुख्य सचिव, मदत व पुनर्वसन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. प्रधान सचिव (सार्वजनिक बांधकाम), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०.प्रधान सचिव (विधी व परामर्शी), विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११.विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई
१२.सचिव (रस्ते), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१३.सचिव (बांधकामे), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१४.मुख्य अभियंता (पी-६), रस्ते वाहतूक व महामार्ग मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली
१५.मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग (सा.बां.), कोकण भवन, नवी मुंबई
१६.जिल्हाधिकारी, रायगड, मु.अलिबाग
१७.पोलीस अधीक्षक, रायगड, मु.अलिबाग
१८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१९.महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई

२०.जिल्हा कोषागार अधिकारी, अलिबाग, जि.रायगड
२१.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ (अर्थसंकल्प-११/ व्यय-७)
२२.प्रोथोनोटरी आणि सिनियर मास्टर, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई
२३.प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई
२४.निवडनस्ती.